**जिल्हा परिषदेच्या महिला व बाल विकास विभागाच्या जिल्हा संवर्गातील वर्ग-३ व वर्ग-४ च्या संवर्गातील एकुण १३६ अस्थायी पदांना दिनांक १/१०/२०१८ ते २८/२/२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र. मबाआ-२०१८/प्र.क्र.१६/का-७-अ**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: १७ सप्टेंबर, २०१८.

**संदर्भ**:- १) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२००२/प्र.क्र.९५/का-७, दिनांक ५ एप्रिल, २००३
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि-२०१५/प्र.क्र.५/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २० फेब्रुवारी, २०१५
३) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ- २०१५/प्र.क्र.५/का-७-अ, दिनांक २ मार्च,२०१५.
४) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.मबाआ- २०१६/प्र.क्र.६/का७-अ, दिनांक १९ मार्च,२०१५.
५) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.मबाआ- २०१६/प्र.क्र.१६/का७-अ, दिनांक २६ मार्च, २०१८
६) उपआयुक्त (प्रशासन), महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे यांचे पत्र क्र. जि.प./अस्थायी पदे/२०१८-१९/का-१/४७०४, दिनांक १०/०८/२०१८.
७) शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दिनांक ७ सप्टेंबर,२०१८.

**शासन निर्णय:-**

महिला व बाल विकास विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयांमधील पदांचा आढावा घेवून आकृतीबंध शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२००२/प्र.क्र.९५/का-७, दि. ५.४.२००३ अन्वये मंजूर केलेला आहे. सदर आकृतीबंधानुसार **जिल्हा परिषदेच्या महिला व बाल विकास विभागाच्या जिल्हा संवर्गातील वर्ग-**३ **व वर्ग-**४ **च्या संवर्गातील एकुण** १३६ **अस्थायी पदांना** संदर्भाधीन क्र.५ च्या शासन निर्णयान्वये दि. १.३.२०१८ ते ३०.९.२०१८ पर्यत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात आली होती.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक-७ येथील दिनांक ७.९.२०१८ च्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना, तसेच यापुर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या, परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक १.१०.२०१८ ते दिनांक २८.२.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

३. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी **जिल्हा परिषदेच्या महिला व बाल विकास विभागाच्या जिल्हा संवर्गातील वर्ग-३ व वर्ग-४ च्या संवर्गातील एकुण** १३६ **अस्थायी** पदांपैकी एकही पद ६ महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नाही असे संदर्भाधीन क्रमांक-६ येथील दिनांक १०.८.२०१८ च्या पत्रान्वये प्रमाणित केले आहे. त्यानुसार वित्त विभागाच्या उपरोक्त शासन निर्णयामधील तरतुदीनुसार **जिल्हा परिषदेच्या महिला व बाल विकास विभागाच्या जिल्हा संवर्गातील वर्ग-३ व वर्ग-४ च्या संवर्गातील एकुण** १३६ **अस्थायी** पदांना दिनांक १.१०.२०१८ ते दिनांक २८.२.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. या पदांची वेतनश्रेणी व मुदतवाढ दिलेल्या एकुण पदांची संवर्गनिहाय माहिती सोबतच्या विवरणपत्रामध्ये दर्शविण्यात आलेली आहे.

४. सदरचा शासन निर्णय वित्त विभाग पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दिनांक ७/९/२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळाद्वारे उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९१७१११६०३९३३० असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने**,**

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: CN = Lalsing Ramchandra Gujar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Women And Child Development Department
Date: 2018.09.27 11:58:04 +05'30'

**(ला.रा.गुजर)**
**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल,महाराष्ट्र राज्य १/२ (लेखा व अनुज्ञेयता) ( लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर
२. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे
३. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई
४. सर्व महिला व बाल विकास अधिकारी, जिल्हा परिषद (आयुक्तालय, पुणे यांचे मार्फत)
५. सर्व जिल्हा महिला बाल विकास अधिकारी, (आयुक्तालय, पुणे यांचे मार्फत)
६. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,(आयुक्तालय, पुणे यांचे मार्फत)
९. वित्त विभाग (का-६/वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय,मुंबई
१०.निवड नस्ती, का-७अ

**शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.मबाआ-२०१८/प्र.क्र.१६/का-७अ, दि.१७/०९/२०१८**
**सोबतचे विवरणपत्र**

**<u>जिल्हा परिषद मधील महिल व बाल विकास अंतर्गत वर्ग-३ व ४ अस्थायी पदांचे विवरणपत्र</u>**

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | ग्रेड वेतन | मंजूर पदे (३४ जिल्हे) |
|---|---|---|---|---|
| १ | कक्ष अधिकारी | ९३००-३४८०० | ४३०० | ३४ |
| २ | वरिष्ठ सहायक (लेखा) | ५२००-२०२०० | २४०० | ३४ |
| ३ | कनिष्ठ सहायक | ५२००-२०२०० | १९०० | ३४ |
| ४ | शिपाई | ४४४०-७४४० | १३०० | ३४ |
| | | एकूण | | १३६ |

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: CN = Lalsing Ramchandra Gujar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Women And Child Development Department
Date: 2018.09.27 11:58:24 +05'30'

(ला.रा.गुजर)
सह सचिव,महाराष्ट्र शासन